**पुणे विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचा-यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये निवडीने नियुक्त्या.**

महाराष्ट्र शासन
आदेश क्रमांक:-मविसे १०/२००८/प्र.क्र.२९९/आस्था-३
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ६ ऑगस्ट, २००९

## आदेश

जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३मधील श्री.सुरेश आत्माराम मारकड विस्तार अधिकारी(पंचायत ) जिल्हा परिषद, सातारा यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये रुपये ६५००- २००- १०५०० या वेतनश्रेणीत निवडीने नियुक्ती देण्यात येत आहे. श्री.मारकड यांची निवडीने नियुक्तीनंतर **गट विकास अधिकारी, पंचायत समिती, जावळी जिल्हा सातारा या रिक्त पदावर नियुक्ती करण्यात येत आहे.**

२. श्री.मारकड यांना देण्यात आलेली निवडीने नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ ) सदर निवडीने नियुक्ती ही संबंधित अधिका-यांने महाराष्ट्र विकास सेवा विभागीय परिक्षा नियम १९९१ व सुधारणा नियम १९९८ मधील तरतूदी नुसार विहीत मुदतीत परिक्षा उतीर्ण होण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ब ) सदर निवडीने नियुक्ती ही शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही १०८७/ २००/ प्र.क्र.३/८७/ १२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतुदीच्या अधीन राहील.

क) सदर निवडीने नियुक्ती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत. परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत. अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

**ड)सदर निवडीने नियुक्ती ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्रमांक ८४५२ / २००४ मध्ये होणा-या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.**

इ ) सदर निवडीने नियुक्ती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

ई) सदर निवडीने नियुक्ती ही बिंदू नामावली नोंदवही अंतिम मंजूरीच्या अधीन राहून राहील.

३. श्री.मारकड यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवासाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून,शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही १०८७/११३१/प्र.क्र.११/८९/ १२, दिनांक ३०. ४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांच्या केलेल्या निवडीने नियुक्त्या रद्द करण्यात येतील.

४. विभागीय आयुक्त, पुणे विभाग पुणे /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा ,सातारा यांनी श्री.मारकड यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन , तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित कर्मचा-यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

५. श्री.मारकड यांनी त्यांच्या नविन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७ /२८ /११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील. याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(कैलास शिंदे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति
१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई ( पत्राने )
२. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त,पुणे विभाग,पुणे
४.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,पुणे, सातारा, सोलापूर, सांगली व कोल्हापूर
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद,पुणे, सातारा, सोलापूर, सांगली व कोल्हापूर
६. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजन संचालनालय, नवी मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य- महाराष्ट्र- २ नागपूर
८. खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास )
९. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री,( ग्राम विकास )
१०. सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
११ संबंधित अधिकारी (द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२ /योजना-५ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३ ग्राम विकास व जलसंधारण विभाग